**तहसिलदार संवर्गातील अधिका-यांची पदस्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२५/प्र.क्र.१०९/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० मे, २०२५

**संदर्भ**:- १) शासन आदेश क्र. निलंबन-२१२४/२३५/प्र.क्र.२१०/ई-४, दिनांक २७/०९/२०२४
२) शासन आदेश क्र.पुन:स्था-२०२५/प्र.क्र.०५/ई-४, दिनांक १७/०३/२०२५

**शासन आदेश:-**

श्री.प्रकाश व्हटकर हे तहसिलदार कोरपना जि.चंद्रपूर येथे कार्यरत असताना मौजा कढोली (खु.) ता.कोरपना, जि.चंद्रपूर येथील ग्रामपंचायत सरपंच व सदस्य यांना सरपंच व सदस्य पदावरून निरर्ह ठरविल्यानंतर त्यांनी केलेल्या अपीलाची मुदत संपण्याच्या आत सरपंच निवडणूकीची कार्यवाही करुन गंभीर अनियमितत केल्याच्या अनुषंगाने, त्यांना म.ना.से.(शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ४(१)(अ) मधील तरतुदीनुसार संदर्भाधीन आदेश क्र.१, दि.२७.०९.२०२४ अन्वये शासन सेवेतून निलंबित करण्यात आले होते.

२. तद्नंतर संदर्भ क्र.२ येथील दिनांक १७.०३.२०२५ रोजीच्या शासन आदेशान्वये त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले असून, ते नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत.

३. सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) (एक) मधील तरतुदींनुसार श्री.प्रकाश व्हटकर यांची खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.प्रकाश व्हटकर | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | **तहसिलदार (सर्वसामान्य), जि.का.धाराशिव या रिक्त पदावर** |

४. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिकारी यांनी स्तंभ क्र.४ मधील नमूद पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधीत अधिकारी त्यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e3.revenue@maharashtra.gov.in या ईमेलद्वारे / टपालाद्वारे शासनास त्वरीत कळवावे.

५.	महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"*(dies non)* म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६.	संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७.	सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५३०२२३५४२७५१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PRALHAD SAPKAL

Digitally signed by PRASHANT PRALHAD SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=c2ec242caef55e035a22245b60a2752c90753e697f5e5659 6b3524d34280a891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9548CB33E24729A59B6A5C72EE905604BA53420C8 EACFD34E9E8C2460B8AA409, cn=PRASHANT PRALHAD SAPKAL
Date: 2025.05.30 22:36:44 +05'30'

**(प्र.प्र.सपकळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर / नागपूर.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.

- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- श्री. प्रकाश व्हटकर, तहसिलदार (विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).